**सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरीता इको टास्क फोर्स बटालियन (२४०६ A२११) लेखाशीर्षांतर्गत निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः साववि-२०२३/प्र.क्र.५५/फ-११**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

दिनांक:-३० मार्च, २०२४

<u>वाचा</u>:-

१) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक -साववि-२०१६/प्र.क्र.१२९/फ-११, दिनांक १३.१०.२०१६
२) वित्त विभाग,शासन परिपत्रक क्रमांक-अर्थसं-२०२३/प्र.क.४०/अर्थ-३, दिनांक १२ एप्रिल, २०२३
३) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक-साववि-२०२३/प्र.क्र.११/फ-११, दिनांक २७.०६.२०२३
४) अपर प्रधान मुख्य वन संरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे क्रमांक कक्ष-१/ पी/यो/चाबाप्र/प्र.क्र.९१/३५६/२०२३-२४, दिनांक ०८.०८.२०२३
५) अपर प्रधान मुख्य वन संरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे क्रमांक कक्ष-१/पी/यो/चाबाप्र/प्र.क्र.९१/६३४/२०२३-२४, दिनांक ०२.११.२०२३
६) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक -साववि-२०२३/प्र.क्र.५५/फ-११, दिनांक ३०.११.२०२३
७) अपर प्रधान मुख्य वन संरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे क्रमांक कक्ष-१/पी/यो/चाबाप्र/प्र.क्र.९१/९२१/२०२३-२४, दिनांक १९.०१.२०२४
८) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक-अर्थसं-२०२३/प्र.क.४०/अर्थ-३, दिनांक ०५.०२.२०२४
९) महसूल व वन विभाग, शासन निर्णय समक्रमांक दिनांक २२.०२.२०२४

<u>प्रस्तावना</u>:-

मराठवाडा महसूल विभागातील एकूण ८ जिल्ह्यांमध्ये भौगोलिक क्षेत्राच्या तुलनेत वनाच्छादित क्षेत्राचे प्रमाण कमी आहे. मराठवाड्यात एकंदर पर्जन्यमान तसेच वृक्ष लागवडीसाठी लागणारी आवश्यक जमिनीची प्रत या दोन्ही बाबी प्रतिकूल असल्याने वृक्ष लागवडीसाठी विविध पर्याय विचारात घेऊन वनाच्छादन वाढविण्याकरीता शासन प्रयत्नशिल आहे. त्यानुषंगाने मराठवाड्यातील वनाच्छादित क्षेत्राचे प्रमाण वाढविण्यासाठी मराठवाडा विभागात सुरुवातील इको टास्क फोर्स बटालियनची एक कंपनी स्थापन करून नंतर टप्याटप्याने इतर जिल्ह्यामध्ये अन्य कंपन्याची स्थापन करण्याबाबतचा निर्णय सन २०१६ मध्ये घेण्यात आलेला आहे. त्यानुसार संदर्भाधीन क्रमांक १ येथील शासन निर्णयान्वये छत्रपती संभाजीनगर येथे इको टास्क फोर्स बटालियनची एक कंपनी स्थापन करण्यात आली आहे. तद्नंतर संदर्भाधीन क्रमांक २ येथील शासन निर्णयान्वये मराठवाडा विभागातील हिंगोली व बीड या दोन जिल्ह्यांकरीता प्रत्येकी एक याप्रमाणे अन्य दोन कंपन्याची स्थापना करण्यात आलेली आहे. सदर कंपन्यांकरीता सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरीता निधी वितरीत करण्याबाबत संदर्भाधीन क्रमांक ४, ५ व ७ येथील पत्रान्वये शासनास विनंती करण्यात आली आहे.

०२. सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात इको टास्क फोर्स बटालियनमार्फत करण्यात आलेल्या रोपवनाच्या बांधील कामांकरीता, नवीन कामांकरीता तसेच इको टास्क फोर्स बटालीयन मधील अधिकारी/कर्मचारी यांचे वेतन व भत्ते अदा करण्यासाठी निधीची आवश्यकता असल्याचे संदर्भाधीन क्रमांक ४, ५ व ७ येथील पत्रान्वये केलेल्या विनंतीनुसार **"इको टास्क फोर्स बटालियन (२४०६ A२११)"** या योजनेंतर्गत सन २०२३-२४ करिता ५०-इतर खर्च या उद्दिष्टांतर्गत

अर्थसंकल्पीत तसेच पुरवणी मागणीव्दारे मंजूर करण्यात आलेल्या रू.२७४९.०० लक्ष नियतव्ययामधून निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात “इको टास्क फोर्स बटालियन (२४०६ A२११)” या योजनेंतर्गत पुढील तत्क्यात नमूद केल्यानुसार निधी वितरीत करण्यात येत आहे.

(रू. लाखात)

| अ. क्र. | योजनेचे नाव | आठ अंकी संकेताक क्रमांक | अर्थसंकल्पित + पुरवणी मागणी नुसार मंजूर एकूण नियतव्यय | वित्त विभागाने १००% मर्यादेत दिलेल्या मान्यतेनुसार उपलब्ध निधी | विभागाकडून शा. नि. दिनांक ३०.११.२०२३ व दिनांक २२.०२.२०२३ अन्वये वितरीत करण्यात आलेला निधी | वितरीत करावयाचा निधी |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | | ५ | ६ |
| १ | “इको बटालियन टास्क फोर्स” | २४०६-A२११ ( ५०- इतर खर्च) | १४८८.००+१२६१.०० | २७४९.०० | १९२४.३० | ८२४.७० |
| | | **एकुण** | **२७४९.००** | **२७४९.००** | **१९२४.३०** | **८२४.७०** |

०२. उपरोक्त तक्त्यात स्तंभ क्रमांक ६ मध्ये नमूद केल्यानुसार “इको टास्क फोर्स बटालियन” (२४०६ A२११) या लेखाशिर्षाखाली सन २०२३-२४ या वर्षाकरीता अर्थसंकल्पीत करण्यात असलेल्या निधीपैकी ५०-इतर खर्च या उद्दिष्टांतर्गत **रु.८२४.७० लक्ष** निधी वितरीत करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

०३. सदर निधी हा नियंत्रक अधिकारी, म्हणून अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्याकडे सुपूर्त करण्यात येत आहे. या योजनेंतर्गत घ्यावयाच्या कामाची अंमलबजावणी कृती आराखड्याप्रमाणे, विहित कार्यपध्दतीनुसार आणि ठरविलेल्या मुदतीत करण्याबाबत दक्षता घ्यावी. याबाबत सविस्तर मार्गदर्शक सूचना क्षेत्रीय अधिकाऱ्यांना द्याव्यात आणि अंमलबजावणीबाबत वेळोवेळी आढावा घ्यावा. सदर निधी मंजूर असलेल्या योजनेंतर्गत कामांवरच खर्च करण्यात यावा. मंजूर निधीपेक्षा जास्त खर्च होणार नाही याची नियंत्रक अधिकाऱ्यांनी दक्षता घ्यावी. सदर योजनेतंर्गत प्रस्तावित कामांना तांत्रिक व प्रशासकीय मंजूरी देण्यात आली असल्याची खात्री करूनच निधी वितरित करण्यात यावा.

०४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), हे वर्ष २०२३-२४ मध्ये सदर योजनेंतर्गत वितरीत केलेल्या निधीबाबत उपयोगिता प्रमाणपत्र ७ दिवसांत शासनास सादर करतील.

०५. सदर निधी वितरित करण्यापूवी अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी सदर योजनेसाठी सन २०२३-२४ करिता वितरित केलेला निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणाली व्यतिरिक्त अन्यत्र ठिकाणी वळता केला नसल्याची खात्री करावी.

०६. सदर निधी खर्च करताना वित्त विभागाच्या संदर्भ क्रमांक २ येथील शासन परिपत्रकातील तरतूदी व महाराष्ट्र अर्थसंकल्पीय नियम पुस्तिका, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका यामध्ये उल्लेख केलेल्या तरतुदींनुसार व वेळोवेळी दिलेल्या सूचनांचे पालन करण्यात यावे.

०७. वितरीत करण्यात आलेल्या तरतुदीची माहिती व राबविण्यात आलेल्या कार्यक्रमाची/झालेल्या खर्चाचा तपशील शासनास विहित प्रपत्रात सादर करण्यात यावा. तसेच योजनेचे संनियंत्रण प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्यामार्फत व्हावे.

०८. सदर योजने अंतर्गत होणारा खर्च खाली नमूद केलेल्या लेखाशीर्षाखाली सन २०२३-२४ च्या मंजूर अर्थसंकल्पीत निधीतून खर्ची टाकण्यात यावा.

**मागणी क्र. सी-०७**
**२४०६, वनीकरण व वन्यजीवन (राज्य) योजनांतर्गत योजना**
**११० वन्य जीव संरक्षण**
**इको टास्क फोर्स बटालियन (००)(२६) (२४०६ A२११)**
**५०- इतर खर्च**

०९. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या सहमतीने तसेच वित्त विभागाने अनौपचारीक संदर्भ क्रमांक १६५/व्यय-१०, दिनांक २८.०३.२०२४ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

१०. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२४०३३०१७१३५२५८१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

RAVIKIRAN
SABAJI GOVEKAR

Digitally signed by RAVIKIRAN SABAJI GOVEKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT,
2.5.4.20=223dbaf509e56a22dd8c9d33c199767837144d5824e7011745d9a521fdbedad3, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=B752370B557D0A3E58B4B069230BC54F6A13D04798D2EE7A3F1C7DCC5655271C, cn=RAVIKIRAN SABAJI GOVEKAR
Date: 2024.03.30 17:23:49 +05'30'

**( डॉ. रविकिरण गोवेकर )**
**मुख्य वनसंरक्षक (मंत्रालय)**

**प्रत,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक, (वनबल प्रमुख ),महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (सामाजिक वनीकरण) , महाराष्ट्र राज्य, पुणे.
३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४. मुख्य वनसंरक्षक/वनसंरक्षक (प्रादेशिक ) छत्रपती संभाजीनगर)
५. वनसरंक्षक , सामाजिक वनीकरण, छत्रपती संभाजीनगर)

६. उप वनसंरक्षक (प्रा) (छत्रपती संभाजीनगर/विभागीय वन अधिकारी (प्रा), छत्रपती संभाजीनगर, हिंगोली व बीड/ उपविभागीय वन अधिकारी (प्रा), छत्रपती संभाजीनगर, हिंगोली व बीड
७. विभागीय वन अधिकारी,सामाजिक वनीकरण (छत्रपती संभाजीनगर, हिंगोली व बीड)
८. महालेखापाल, (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ व २ , मुंबई व नागपूर,
९. जिल्हा कोषागार अधिकारी, छत्रपती संभाजीनगर, हिंगोली व बीड
१०. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई ४०० ०३२.
११. निवासी परिक्षा लेखा अधिकारी,मुंबई
१२. वित्त विभाग,व्यय-१०,अर्थसंकल्प-०६ मंत्रालय, मुंबई-३२
१३. कार्यासन अधिकारी, फ-२,महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१४. कार्यासन अधिकारी, ब-१,महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१५. निवडनस्ती फ-११